ग्रामपंचायत हद्दीतील मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेंतर्गत प्रकल्पांना मालमत्ता कर आकारणीमधील सवलत बाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: व्हीपीएम-२०१७/प्र.क्र.२५१/पंरा-४
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई - ४००००१
दिनांक :- ११ जून, २०१८.

**वाचा :-** उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. सौरप्र-२०१६/प्र.क्र.३५४/ऊर्जा-७ दिनांक १४ जून, २०१७

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम कलम १२४ व त्याअंतर्गत महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी (शुल्क) नियम, १९६० यांमधील तरतुदींनुसार गावाच्या सीमेतील इमारती (मग त्या कृषी आकारणीस अधीन असोत किंवा नसोत) व जमिनी (ज्या कृषी आकारणीस अधीन नाहीत) यावर ग्रामपंचायतीस कर बसविण्याचा अधिकार आहे.

वाचा येथील शासन निर्णयान्वये मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना सुरू करण्यात आली असून त्यामधील परि. ६ मध्ये "अशा जमिनींवर वा सौर ऊर्जा प्रकल्पांना महसूल अथवा स्थानिक स्वराज्य संस्था इ. विभागाकडून आकारण्यात येणाऱ्या सर्व करांतून प्रकल्प उभारणीपासून ३० वर्षापर्यंत सूट राहील" अशी तरतूद करण्यात आली आहे. या तरतुदीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांना सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**वाचा** येथील शासन निर्णयान्वये मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना सुरू करण्यात आली असून त्यामधील परि. ६ मध्ये ***"अशा जमिनींवर वा सौर ऊर्जा प्रकल्पांना महसूल अथवा स्थानिक स्वराज्य संस्था इ. विभागाकडून आकारण्यात येणाऱ्या सर्व करांतून प्रकल्प उभारणीपासून ३० वर्षापर्यंत सूट राहील"*** अशी तरतूद करण्यात आली आहे. या तरतुदीच्या

अनुषंगाने ग्रामपंचायत हद्दीतील महानिर्मिती कंपनीने महाऊर्जाकडे नोंदणी केलेल्या मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेंतर्गत उभारण्यात येणाऱ्या प्रकल्पांना मालमत्ता कर आकारणीमध्ये प्रकल्प उभारणीपासून ३० वर्षांपर्यंत सवलत अनुज्ञेय राहील. परंतु सदरील प्रकल्प हा मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेंतर्गत असल्याबाबतचे सक्षम प्राधिकाऱ्याचे (महानिर्मिती/महाऊर्जा यांचे) प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. संबंधित प्राधिकरणाने प्रमाणपत्रामध्ये सदरील प्रकल्पाचा उभारणीपासून ३० वर्षापर्यंतचा कालावधी नमूद करावा.

सदरचा शासन निर्णय मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व संबंधित अधिकारी, कर्मचारी व ग्रामपंचायती यांच्या निदर्शनास आणण्यात यावा व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201806111118006420 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Raghunath Bankar

Digitally signed by Sanjay Raghunath Bankar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Devlopment And Water Conservation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay Raghunath Bankar
Date: 2018.06.11 13:20:10 +05'30'

**संजय बनकर**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-:

१. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
२. मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा, विधानमंडळ, मुंबई.
३. मा. विधानसभा/मा. विधान परिषद सदस्य ( सर्व)
४. मा. राज्यपाल यांचे सचिव
५. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
६. मा.मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
७. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव

८. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (ऊर्जा ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधार कंपनी मर्या., मुंबई.
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या., मुंबई.
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई .
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या., मुंबई .
१५. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, (महाऊर्जा), पुणे.
१६. विधी मंडळ ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (१० प्रती).
१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१८. सर्व विभागीय आयुक्त.
१९. सर्व जिल्हाधिकारी.
२०. सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. सर्व उपायुक्त (विकास/आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालये.
२२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता).
२३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व परिक्षा अनुज्ञेयता) .
२४. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
२५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२७. सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक.
२८. माहिती तंत्रज्ञान कक्ष (ग्रा.वि.वि), बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
२९. निवडनस्ती, कार्यासन पंरा-४.